अनुकंपा निवृत्तीवेतन मंजूर करणेबाबत.
**श्रीमती शरीफा इक्बालपाशा पटेल (पाटील)**

**महाराष्ट्र शासन**
**कृषि पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग,**
**शासन आदेश क्रमांक- कृषिआ २७२०/प्र.क्र.२२७/१६-अे**
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक: २७ ऑक्टोबर, २०२१.

**संदर्भ:-** कृषि आयुक्तालयाचे पत्र क्र.कृआ/लेखा-१/पीइएन-३/कोल्हापूर /अनु.निवे/शइप/२०६४८/२०२०, दि.३१.०८.२०२० आणि दि.२५.०५.२०२१

**शासन आदेश :-**

कै.श्री.इक्बालपाशा सय्यदहुसेन पटेल (पाटील), बडतर्फ वरिष्ठ लिपिक यांच्या पत्नी श्रीमती शरीफा इक्बालपाशा पटेल (पाटील) यांना अनुकंपा निवृत्तीवेतन मंजूर करण्याबाबतचा प्रस्ताव कृषि आयुक्तालयाने संदर्भाधिन पत्रांन्वये शासनास सादर केला होता.

२. कै.श्री.इकबालपाशा सय्यदहुसेन पटेल(पाटील) वरिष्ठ लिपिक, तालुका कृषि अधिकारी, आजरा, जि.कोल्हापूर या कार्यालयात कार्यरत असताना दि.०१.११.२००५ पासून अनधिकृत गैरहजर होते. कै.श्री.पटेल यांच्या अनधिकृत गैरहजेरीबाबत त्यांना वेळोवेळी कारणे दाखवा नोटीस देवूनही त्यांनी त्याची दखल न घेतल्यामुळे श्री.पटेल यांचेविरुध्द महाराष्ट्र नागरी सेवा (शिस्त व अपिल) नियम, १९७९ मधील नियम ८ अन्वये विभागीय चौकशीची कार्यवाही सुरु करण्यात आली होती. तथापि, विभागीय चौकशीसाठी दोषारोप पत्राच्या अनुषंगाने श्री.पटेल यांनी कोणताही खुलासा केला नाही. श्री.पटेल यांचेवरील दोषारोपपत्र सिध्द होत असल्याचा निष्कर्ष चौकशी अधिकारी यांनी दिल्यानंतर चौकशी अहवालाची प्रत बजावण्यासाठी तालुका कृषि अधिकारी आजरा कार्यालयातील प्रतिनिधी श्री.पटेल यांच्या राहत्या पत्त्यावर गेले. परंतू, ते तेथे राहत नसल्यामुळे सदरचा अहवाल परत आला. तसेच तदनंतर त्यांच्या आईने दिलेल्या सातारा येथील पत्त्यावर देखील श्री.पटेल आढळून आले नाहीत. श्री.पटेल यांचा ठावठिकाणा लागत नसल्यामुळे व ते आपला पत्ता कार्यालयास कळविण्यात नसल्यामुळे त्यांना शासन सेवेची गरज नसल्याचे दिसून येते, असा निष्कर्ष काढण्यात आला. तद्नंतर विभागीय कृषि सहसंचालक, कोल्हापूर यांच्या दि.२०.०५.२०११ च्या आदेशान्वये श्री.पटेल यांना अनधिकृत गैरहजेरी या कारणास्तव शासकीय सेवेतून बडतर्फ करण्यात आले होते.

३. सदर शिक्षेविरुध्द श्री.पटेल यांनी कोणतेही अपिल केलेले नव्हते. दरम्यानच्या कालावधीत दि.०४.०१.२०१३ रोजी श्री.पटेल यांच निधन झाले. शासकीय सेवेतून बडतर्फ केल्याच्या आदेशाविरुध्द श्री.पटेल यांच्या पत्नी श्रीमती शरीफा इकबालपाशा पटेल (पाटील) यांनी महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, मुंबई येथे मूळ अर्ज क्र.९९१/२०१६ दाखल केला होता. सदर मूळ अर्जावर मा.न्यायाधिकरणाने दि.२३.०७.२०१८ रोजी दिलेल्या न्यायनिर्णयाच्या अनुषंगाने अर्जदाराने दि.०३.०२.२०१४ व दि.२१.०३.२०१६ रोजी सादर केलेल्या अर्जावर निर्णय घेण्याबाबत आदेशित करण्यात आलेले आहे.

४. मा.न्यायाधिकरणाने दिलेल्या न्यायनिर्णयानुसार अपिलीय अधिकारी तथा आयुक्त (कृषि) पुणे यांचेकडे दि.२७.११.२०१८ रोजी महाराष्ट्र नागरी सेवा (शिस्त व अपिल) नियम १९७९ मधील नियम २५ अन्वये सुनावणीचे आयोजन करण्यात आले होते. सुनावणी दरम्यान श्रीमती पटेल यांनी असे सांगितले की, त्यांचे पती दि.०१.११.२००५ पासून अचानक मानसिक संतुलन बिघडल्यामुळे दवाखान्यात उपचार घेत होते. त्यामुळे ते दि.०१.११.२००५ पासून मृत्यूच्या दिनांकापर्यंत कार्यालयामध्ये उपस्थित राहू शकलेले नाहीत. श्री.पटेल यांचा ठावठिकाणा न लागल्यामुळे कार्यालयाने अनधिकृत गैरहजेरी व तद्नंतर विभागीय चौकशीच्या अनुषंगाने केलेला पत्रव्यवहार त्यांचेपर्यंत पोहचू शकला नाही. श्री.पटेल यांनी कोणताही गंभीर गुन्हा केलेला नसल्यामुळे व ते मानसिकदृष्टया आजारी असल्यामुळे त्यांनी केलेल्या २६ वर्षे सलग शासकीय सेवेचा सहानुभूतीपूर्वक विचार करुन बडतर्फीचा आदेश रद्द करण्याची विनंती श्रीमती पटेल यांनी केलेली होती. श्री.पटेल यांचे विरुध्द सुरु करण्यात आलेली विभागीय चौकशीची कार्यवाही त्यांना ज्ञात नसल्यामुळे शासकीय सेवेतून बडतर्फ करण्याची बजावण्यात आलेली शिक्षा एकतर्फी देण्यात आलेली आहे. श्री.पटेल यांचे मानसिक आजारपणामुळे तसेच त्यांचे दि.०४.०१.२०१३ रोजी निधन झाल्यामुळे त्यांना बजावण्यात आलेल्या शिक्षेविरुध्द अपिल झालेले नव्हते. या बाबी विचारात घेता आयुक्त (कृषि) यांच्या दि.२४.१०.२०१९ च्या आदेशान्वये श्री.पटेल यांना देण्यात आलेल्या बडतर्फीच्या शिक्षेत बदल करुन त्याऐवजी महाराष्ट्र नागरी सेवा (शिस्त व अपिल) नियम १९७९ मधील नियम क्र.५ मधील पोट नियम (आठ) मधील तरतूदीनुसार सेवेतून काढून टाकणे ही शिक्षा देण्यात आली.

५. या आदेशाच्या अनुषंगाने श्रीमती पटेल यांनी दि.१८.११.२०१९ च्या अर्जान्वये शासकीय नियमाप्रमाणे अनुकंपा निवृत्तीवेतन मिळण्याची विनंती केली आहे. महाराष्ट्र नागरी सेवा (निवृत्तीवेतन) नियम १९८२ मधील नियम १०१ मध्ये अनुकंपा निवृत्तीवेतन देण्यात ची तरतूद आहे. या नियमातील तरतूदीनुसार सेवेतून काढून टाकलेला शासकीय कर्मचारी त्याचे निवृत्तीवेतन व उपदान गमावील. मात्र, खास विचारयोग्य प्रकरण असेल तर शासन त्याला तो जर भरपाई निवृत्तीवेतनावर निवृत्त झाला असता तर त्यास जेवढे निवृत्तीवेतन किंवा उपदान किंवा दोन्ही अनुज्ञेय ठरले असते त्याच्या दोन तृतीयांशहून अधिक नाही इतके अनुकंपा निवृत्तीवेतन मंजूर करु शकेल.

६. श्री.पटेल यांचे मानसिक संतुलन बिघडलेले असणे, त्यांचेविरुध्द सुरु असलेल्या विभागीय चौकशीबाबत त्यांना काहीही ज्ञात नसणे, त्यांना बजावण्यात आलेल्या बडतर्फीच्या शिक्षेविरुध्द अपिल झालेले नसणे, तसेच त्यांचे दि.०४.०१.२०१३ रोजी निधन होणे, आयुक्त (कृषि) तथा अपिलीय अधिकारी यांनी बडतर्फीऐवजी सेवेतून काढून टाकणे असा शिक्षेमध्ये बदल करणे या सर्व बाबी विचारात घेता, कै.श्री.इक्बालपाशा सय्यदहुसेन पटेल (पाटील) यांना महाराष्ट्र नागरी सेवा (निवृत्तीवेतन) नियम १९८२ मधील नियम १०१ मधील तरतूदीनुसार दि.०१.११.२००५ ते दि.४.०१.२०१३ (श्री.पटेल यांच्या मृत्यूचा दिनांक) या कालावधीकरिता अनुकंपा निवृत्तीवेतन व तदनंतर त्यांच्या पत्नी श्रीमती शरीफा इक्बालपाशा पटेल (पाटील) यांना अनुकंपा कुटूंब निवृत्तीवेतन मंजूर करण्यास मान्यता देण्यात येत आहे. तदनुषंगिक थकबाकी कै.श्री.पटेल यांच्या पत्नी श्रीमती शरीफा इक्बालपाशा पटेल (पाटील) यांना अदा करण्यात यावी. तथापि, सदर अनुकंपा निवृत्तीवेतन हे कै.श्री.पटेल कार्यालयीन गैरहजेरीपूर्वी ते घेत असलेल्या वेतनावर अनुज्ञेय करण्यात येत आहे.

७. सदर आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२११०२८११३९५४४००१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

JYOTSNA SUNIL ARJUN

Digitally signed by JYOTSNA SUNIL ARJUN
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=AGRICULTURE AND ADF DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=48807fd571bd08b7318f82f32c3ac18b4a938a342e23932200c3df8b0bdd4563, pseudonym=B6E9ECA936BF2C03EE8B083F338E65F7AF36F6CD, serialNumber=984B9ADBA8339F7D6208C334DDD686A8F076E25FFF19427CAAC5BD0E7F88E592, cn=JYOTSNA SUNIL ARJUN
Date: 2021.10.28 11:42:41 +05'30'

**(ज्योत्स्ना अर्जुन)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
२. सह संचालक, (आस्थापना) कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
३. संबंधित विभागीय कृषि सह संचालक
४. संबंधित जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी
५. संबंधित तालुका कृषि अधिकारी
६. संबंधित कोषागार अधिकारी/उप कोषागार अधिकारी
७. श्रीमती शरीफा इक्बालपाशा पटेल (पाटील) यांना आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, पुणे यांचेमार्फत
८. निवड नस्ती/१६-अे.